**मालेगाव नांदगाव राज्य रस्ता क्र. १६ च्या नांदगाव येथील वळण रस्त्यावरील रेल्वे उड्डाण पूल व जोड रस्ता सार्वजनिक बांधकाम विभागास हस्तांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२००६/प्र.क्र.१६१/रस्ते-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २५ मे, २०१७

**प्रस्तावना :**

शासनाने महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास मालेगाव नांदगाव राज्य रस्ता क्र. १६ च्या नांदगाव येथील वळण रस्त्यावरील रेल्वे उड्डाण पूल व जोड रस्ता प्रकल्पासाठी उद्योजक म्हणून घोषित केले होते. महामंडळाने सदरहू प्रकल्पाचे काम पूर्ण करुन त्यावर दि. ०१.०४.२००८ पासून पथकर वसूली सुरु केली होती. सदर पथकर वसूलीचा कालावधी दि. ३१.०३.२०१३ रोजी संपला आहे. सद्यस्थितीत या प्रकल्पाची देखभाल व दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात येत आहे. दि. ३१.०३.२०१३ पासून सदरहू प्रकल्पावरील पथकर वसूली बंद झाल्यामुळे महामंडळास या प्रकल्पातून कोणत्याही प्रकारचे उत्पन्न प्राप्त होत नसून या प्रकल्पासाठी महामंडळास निधीही अर्थ संकल्पिय तरतुदीतून देण्यात येत नसल्याकरणाने महामंडळास या प्रकल्पाची देखभाल व दुरुस्ती, भूसंपादनाच्या प्रकरणातील वाढीव मोबदल्याचे रक्कम अदा करणे शक्य होत नाही.

**निर्णय :**

मालेगाव नांदगाव राज्य रस्ता क्र. १६ च्या नांदगाव येथील वळण रस्त्यावरील रेल्वे उड्डाण पूल व जोड रस्ता या प्रकल्पाचा ताबा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या अधिकाऱ्यांकडून त्वरीत घ्यावा व यापुढे सदर रस्त्याची देखभाल दुरूस्ती मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी करावी. तसेच या प्रकल्पाच्या अनुषंगाने भूसंपादनाविषयक प्रकरणे (मोबदल्यासह), न्यायालयीन प्रकरणे व अनुषंगिक बाबींबाबत प्रलंबित प्रकरणांसह पुढील कार्यवाही मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक मार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५२६१२२३५८५११८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramchandra Dattatraya Joshi

Digitally signed by Ramchandra Dattatraya Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PW D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a652e9f280742859802a83b556a9f74dc3563d2f7f6c6ec8ad7583e085375954, cn=Ramchandra Dattatraya Joshi
Date: 2017.05.26 12:26:24 +05'30'

**( रा.द. जोशी )**
**अवर सचिव (खा.र.१)**

**प्रत,**

१) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय महासंचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, शिबीर कार्यालय, औरंगाबाद.
६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, अदालत रोड, बांधकाम भवन, औरंगाबाद.
७) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती (रस्ते-८).